**राष्ट्रीय कृषि विकास योजनेच्या समस्याग्रस्त जमीन सुधारणा या उप योजनेतंर्गत बुबनाळ-ओरवाड, शेडशाळ, गणेशवाडी, अर्जुनवाड, कवठेसार, घालवाड, कुटवाड-हसूर ता. शिरोळ, जि. कोल्हापूर या गावांतील क्षारपड जमिनीची सच्छिद्र निचरा प्रणालीचा वापर करून सुधारणा करण्याच्या प्रकल्पास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: राकृवि २०२२/प्र.क्र.५७/१४-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : १७ मे, २०२२

संदर्भ :

१. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र.राकृवि/प्र.क्र. ७४/१४-अे, दि. ०८ मार्च, २०१९
२. राज्य स्तरीय प्रकल्प मंजुरी समितीच्या (SLSC) २९ व्या बैठकीचे इतिवृत्त- पत्र क्र. आरकेव्ही-०१२०/प्र.क्र.१४/१४-अे, दि. ०५ जुलै, २०२१
३. कृषि, सहकार व शेतकरी कल्याण विभाग, कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. १-१५/२०२१ आरकेव्हीवाय, दि. ०१ नोव्हेंबर, २०२१
४. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र.राकृवि/प्र.क्र. ५७/१४-अे, दि. १७ मे, २०२२

प्रस्तावना :

कोल्हापूर जिल्हयातील शिरोळ तालुक्यातील एकूण १०,००० हेक्टर पानथळ-क्षारपड जमिनीपैकी शेडशाळ, गणेशवाडी, अर्जुनवाड, कवठेसार, घालवाड, बुबनाळ-ओरवाड, कुटवाड-हसूर ता. शिरोळ, जि. कोल्हापूर या ७ गावांमध्ये सच्छिद्र निचरा प्रणालीव्दारे सुमारे १९१० हेक्टर क्षारपड जमीन सुधारणा करणेबाबतचा रु. ५९.४५ कोटी प्रकल्प किंमतीचा श्री. दत्त शेतकरी सहकारी साखर कारखाना, लि. शिरोळ यांचा प्रस्ताव मृद व जलसंधारण विभागामार्फत राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत मंजूरीस्तव सादर केला होता. राज्यस्तरीय प्रकल्प मंजुरी समितीने सदर प्रस्तावास केंद्र शासनाची मंजुरी घेण्याच्या अटीच्या अधीन राहून मंजुरी दिली होती. त्यानुसार दि. २९ जुलै, २०२१ रोजी केंद्र शासनास सदर प्रकल्पाचा प्रस्ताव सादर केला होता, केंद्र शासनाने दि.०१ नोव्हेंबर, २०२१ रोजीच्या पत्रान्वये, सन २०१८-१९ मधील राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत समस्याग्रस्त जमीन सुधारणा या उप-योजनेंतर्गत (Reclamation of Problematic Soil) अखर्चित असलेला रु.२.१९ कोटी (केंद्र हिस्सा रु. १.३२ कोटी + राज्य हिस्सा रु. ०.८७ कोटी) निधी सदर प्रकल्पासाठी खर्ची टाकण्यास मान्यता प्रदान केलेली आहे.

उपरोक्त पार्श्वभूमीवर श्री. दत्त शेतकरी सहकारी साखर कारखाना, लि. शिरोळ यांनी ७ गावांतील १९१० हेक्टर क्षेत्रावर क्षारपड जमीन सुधारणा प्रकल्प राबविण्याबाबत सादर केलेल्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती, त्यानुषंगाने शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

## शासन निर्णय :

१. या शासन निर्णयान्वये कोल्हापूर जिल्हयातील शेडशाळ (९० हेक्टर), अर्जुनवाड (८५.२७ हेक्टर), कवठेसार (३७ हेक्टर), गणेशवाडी (३३ हेक्टर), कुटवाड (१४.५३ हेक्टर), घालवाड (६२.२० हेक्टर) व ओरवाड (४३ हेक्टर) ता. शिरोळ या गावांतील एकूण ३६५ हेक्टर क्षेत्रावर सच्छिद्र निचरा प्रणालीचा (Sub-Surface Drainage System) वापर करून क्षारपड जमीन सुधारणा कार्यक्रम राबविण्याकरिता ₹ ११.१९ कोटी अंदाजपत्रकिय खर्चाचा प्रकल्प राबविण्यास आणि त्याकरिता या प्रकल्पांतर्गत लाभार्थी शेतकऱ्यांना राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत समस्याग्रस्त जमीन सुधारणा कार्यक्रम (RPS) या उप-योजने अंतर्गत प्रती हेक्टरी ₹ ६०,०००/- अर्थसहाय्य उपलब्ध करुन देण्यास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. या प्रकल्पांतर्गत शेतकऱ्यांनी राबवावयाच्या प्रकल्पांतर्गत घटक / उपचाराचा आराखडा खालील तक्त्यात नमूद केल्याप्रमाणे राहील, सदर आराखडयातील अनु. क्र. १, २ व ३ या घटकांची शेतकऱ्यांनी स्व-निधीतुन अंमलबजावणी करावयाची असून अनु.क्र.४ येथील सच्छिद्र निचरा प्रणाली या घटकाकरिता राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत समस्याग्रस्त जमीन सुधारणा कार्यक्रम (RPS) या उप-योजने अंतर्गत प्रती हेक्टरी ₹६०,०००/- अर्थसहाय्य लाभार्थी शेतकऱ्यांना अनुज्ञेय राहील. या प्रकल्पांतर्गत राष्ट्रीय कृषि विकास योजनेतंर्गत अर्थसहाय्य व लाभार्थी हिस्सा पुढीलप्रमाणे :

**(रुपये कोटीत)**

| अ. क्र. | घटक | प्रकल्प क्षेत्र | प्रकल्प किंमत | राकृवियो अंतर्गत अर्थसहाय्य |
|---|---|---|---|---|
| १ | प्रक्षेत्र विकास, बांध बंधिस्ती, पाण्याचा पाट, जमिनीस आकार देणे (On farm Development, bunding, irrigation channel, land shaping) | ३६५ हे. | लाभार्थी शेतकऱ्यांनी स्व-निधीतुन राबवावयाच्या बाबी | निरंक |
| २ | भू-सुधारक (Soil amendment (5 tonnes/ha)) | | | |
| ३ | हिरवळीची खते, ऊसाचे बेणे, खते व औषधे (Green Manuring, sugarcane ratoon (seed)] fertilizers and chemicals) | | | |
| ४ | सच्छिद्र निचरा प्रणाली (Sub-surface drainage system (Excavation & refilling of soil, corrugated pipeline, its fitting & laying, construction of outlets)) | | ११.१९ | २.१९ |

३. सदर प्रकल्पाची अंमलबजावणी यंत्रणा म्हणून जलसंधारण विभागाच्या अधिनस्त मुख्य अभियंता, लघु सिंचन (स्थानिक स्तर) राहतील, या प्रकल्पाची अंमलबजावणी सदर यंत्रणेच्या जिल्हा कार्यकारी अभियंता, लघु सिंचन (स्थानिक स्तर) यांच्या पर्यवेक्षणाखाली करण्यात यावी. सदर प्रकल्पाच्या अंमलबजावणीची कार्यपध्दती **परिशिष्ट "अ"** येथे नमूद केली आहे त्यानुषंगाने, जलसंधारण विभागाने सदर प्रकल्पाच्या अंमलबजावणीबाबत सविस्तर मार्गदर्शक सूचना निर्गमित कराव्यात.

४. सन २०१८-१९ मध्ये राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत समस्याग्रस्त जमिन **सुधारणा** (Reclamation of Problematic Soil) या उप-योजनेंतर्गत राज्यास वितरित करण्यात आलेला तथापि, अद्याप अखर्चित असलेला रु.२.१९ कोटी निधी (केंद्र हिस्सा रु. १.३२ कोटी + राज्य हिस्सा रु. ०.८७ कोटी) आयुक्त (कृषि) यांनी शिरोळ तालुक्यातील खालील नमूद ७ गावांच्या एकूण ३६५ हे. जमिनीवर सच्छिद्र निचरा प्रणालीव्दारे क्षारपड जमिन सुधारणा प्रकल्प राबविण्याकरिता अंमलबजावणी यंत्रणेस वितरित करावा. सदर प्रकल्पांतर्गत संबंधित ७ गावातील शेतकऱ्यांचा सहभाग असलेल्या संस्था, त्यांचे सभासद शेतकरी, प्रकल्प क्षेत्र आणि त्याकरिता राकृवियो अंतर्गत देय अनुदानाचा तपशील पुढीलप्रमाणे :

| **गावाचे नाव** | **गट / संस्था** | **सभासद शेतकरी** | **प्रकल्प क्षेत्र (हेक्टर)** | **राकृवियो अनुदान (रु. लाख) (@ रु.६०,००० प्रती हेक्टर))** |
|---|---|---|---|---|
| शेडशाळ | अन्नदाता बहुउद्देशीय क्षारपड जमीन सुधारणा सह. संस्था | ९०० | ९० | ५४ |
| अर्जुनवाड | अर्जुनेश्वर बहुउद्देशीय क्षारपड जमीन सुधारणा सह. संस्था | ७६८ | ८५.२७ | ५१.१६ |
| कवठेसार | कवठेसार बहुउद्देशीय क्षारपड जमीन सुधारणा सह. संस्था | २९९ | ३७ | २२.२० |
| गणेशवाडी | कृषि संजिवनी बहुउद्देशीय क्षारपड जमीन सुधारणा सह. संस्था | ३३५ | ३३ | १९.८० |
| कुटवाड | श्री. नरसिंह बहुउद्देशीय क्षारपड जमीन सुधारणा सह. संस्था | २६० | १४.५३ | ८.७१ |
| घालवाड | श्री. घोलेश्वर बहुउद्देशीय क्षारपड जमीन सुधारणा सह. संस्था | ५५० | ६२.२० | ३७.३२ |
| ओरवाड | ओरवाड-बुबनाळ बहुउद्देशीय क्षारपड जमीन सुधारणा सह. संस्था | २५५ | ४३ | २५.८० |
| **एकूण** | | **३३६७** | **३६५** | **२१९** |

५. वैयक्तिक लाभाच्या प्रकल्पांतर्गत सर्व विभागांनी /अंमलबजावणी यंत्रणांनी लाभार्थ्यांच्या आधार संलग्न बँक खात्यावर थेट लाभ हस्तांतरणाद्वारे (DBT) अनुदान वितरीत करावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०५१७१७१७१८७९०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHRIKANT C ANDGE

Digitally signed by SHRIKANT C ANDGE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPT., postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5d5ab93b4e4f2fcd87e12fe19b8965025d482b1bee0fffaa62085c34db6bfd8c, pseudonym=1CC019CBB7F0A77E397F15793DF809A69806ED98, serialNumber=D8D9626C9E038380CD235C048F20D7CE74CFFD3A95F2AC3C192E9C991F358271, cn=SHRIKANT C ANDGE
Date: 2022.05.17 17:19:30 +05'30'

**सोबत : परिशिष्ट- अ**

**( श्रीकांत चं. आंडगे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:**

१. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई,
२. अपर मुख्य सचिव (वित्त), मंत्रालय, मुंबई,
३. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
४. प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई,
५. सचिव (जलसंधारण), मृद व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई,
६. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
७. मुख्य अभियंता, लघु सिंचन (स्थानिक स्तर), पुणे,
८. संचालक (प्रक्रिया व नियोजन), कृषि आयुक्तालय, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे,
९. महालेखाकार (स्थानिक निकाय लेखा परिक्षा व लेखा), मुंबई,
१०. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर,
११.जिल्हा कोषागार अधिकारी, जि. कोल्हापूर ,
१२.कार्यकारी अभियंता, लघु सिंचन (स्थानिक स्तर), जि. कोल्हापूर,
१३.सहायक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे,
१४.वित्त विभाग (व्यय-१ / अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई,
१५.मा. मंत्री (कृषि व फलोत्पादन) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
१६.मा. राज्यमंत्री (कृषि) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
१७.निवड नस्ती.

# परिशिष्ट "अ"

**कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र. राकृवि २०२२/प्र.क्र. ५७/१४-अे, दि. १७ मे, २०२२ चे सहपत्र**

राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत समस्याग्रस्त जमिन सुधारणा (RPS) या उप-योजनेंतर्गत सच्छिद्र निचरा प्रणालीचा वापर करून (SSD) शेडशाळ, अर्जुनवाड, कवठेसार, गणेशवाडी, कुटवाड, घालवाड व ओरवाड ता. शिरोळ, जि. कोल्हापूर या गावातील क्षारपड जमीन सुधारणा प्रकल्प अंमलबजावणीची कार्यपध्दती :

१. क्षारपड जमीनीवर सच्छिद्र निचरा प्रणालीचा अंवलब करणे हा क्षेत्र उपचार असून तो शेतकऱ्यांनी सामुदायिकरित्या अवलंबावा म्हणून कार्यकारी अभियंता, लघु सिंचन (स्थानिक स्तर) यांच्या पर्यवेक्षणाखाली आत्मा अंतर्गत स्थापन झालेले शेतकऱ्यांचे गट अथवा शेतकरी उत्पादक कंपनी सदर प्रकल्पाची प्रक्षेत्रावर प्रत्यक्ष अंमलबजावणी करतील.

२. या शासन निर्णयाच्या परिच्छेद क्र. ३ मध्ये नमूद केल्यानुसार अनु. क्र. १, २ व ३ या घटकांची शेतकऱ्यांनी स्व-निधीतुन अंमलबजावणी करावयाची असून त्याकरिताच्या खर्चाचे अंदाजपत्रक तयार करुन या बाबींची कार्यकारी अभियंता, लघु सिंचन (स्थानिक स्तर) यांच्या पर्यवेक्षणाखाली गटाच्या स्तरावर अंमलबजावणी करावी.

३. या शासन निर्णयाच्या परिच्छेद क्र. ३ मध्ये नमूद केल्यानुसार केवळ अनु.क्र.४ येथील सच्छिद्र निचरा प्रणाली या घटकाकरिता राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत अर्थसहाय्य देय राहणार आहे. त्याकरिता शेतकऱ्यांच्या गटांनी/शेतकरी उत्पादक कंपन्यांनी क्षारपड जमीनीवर सच्छिद्र निचरा प्रणालीचा अंवलब करण्यासाठी स्वखर्चाने सनदी स्थापत्य अभियंत्यांची नियुक्ती करावी. याकरिता स्थापत्य अभियंत्यांना द्यावयाचे मानधन/सेवाशुल्क व त्यावरील कर इ. खर्च शेतकरी गटाने स्व-निधीतून भागवावयाचा आहे.

४. शेतकरी गटाने नियुक्त केलेल्या सनदी स्थापत्य अभियंत्यामार्फत प्रक्षेत्राचे सर्वेक्षण करुन केंद्रीय क्षारपड जमीन संशोधन संस्था, कर्नाल, हरियाणा (CSSRI) यांनी भारी काळया जमीनीसाठी (Deep Black Cotton Soil-Vertisols) शिफारस केलेल्या बंदिस्त निचरा प्रणालीच्या संकल्पनानुसार प्रकल्प अंमलबजावणीचे संकल्पचित्र व खर्चाचे अंदाजपत्रक तयार करुन घ्यावे.

५. शेतकऱ्यांच्या गटांनी/शेतकरी उत्पादक कंपन्यांनी त्यांच्या प्रक्षेत्राकरिता सनदी स्थापत्य अभियंत्यांनी तयार केलेल्या प्रकल्प अंमलबजावणीचे संकल्पचित्र व खर्चाचे अंदाजपत्रकास ठराव घेऊन मान्यता द्यावी. त्याचप्रमाणे, सदर प्रकल्पाच्या अंमलबजावणीकरिता शेतकऱ्यांच्या गटांनी/शेतकरी उत्पादक कंपन्यांनी सभासद शेतकऱ्यांना बँक कर्ज व स्व-निधीतून आवश्यक निधी उभारण्याचे सुचित करावे. अशाप्रकारे गटातील सर्व सभासद शेतकऱ्यांनी बँकेमार्फत व स्व-निधीतुन व्यक्तिगत क्षेत्राकरिता प्रकल्प अंमलबजावणीसाठी आवश्यक निधीची उभारणी करावी. त्याचप्रमाणे शेतकरी गट या प्रकल्पाकरिता आवश्यक असलेला निधी तसेच शेतकऱ्यांच्या बँक कर्जावरील व्याजास सवलतीसाठी खाजगी कंपन्यांच्या सी.एस.आर. फंडातुन निधी ऊभारू शकतील.

६. प्रकल्प अंमलबजावणीकरिता आवश्यक निधीची उभारणी झाल्यानंतर शेतकऱ्यांच्या गटांनी/शेतकरी उत्पादक कंपन्यांनी व सदर निधीतुन प्रकल्प राबविण्यास सनदी स्थापत्य अभियंत्यांना कार्यारंभ आदेश निर्गमित करावा व त्याबाबत कार्यकारी अभियंता, लघु सिंचन (स्थानिक स्तर) कोल्हापूर यांना अवगत करावे.

७. प्रकल्पांतर्गत कामे कार्यकारी अभियंता, लघु सिंचन (स्थानिक स्तर) यांच्या पर्यवेक्षणाखाली करावयाची असून प्रकल्पासाठी नियुक्त केलेल्या सनदी स्थापत्य अभियंत्यांनी तसेच संबंधित शेतकऱ्यांच्या गटांनी/शेतकरी उत्पादक कंपन्यांनी वेळोवेळी कामाचा प्रगती अहवाल कार्यकारी अभियंता, लघु सिंचन (स्थानिक स्तर) यांना सादर करावा.

८. कार्यकारी अभियंता, लघु सिंचन (स्थानिक स्तर) यांनी शेतकऱ्यांच्या गटांच्या/उत्पादक कंपनींच्या प्रकल्प क्षेत्रास वेळोवेळी भेट द्यावी व प्रकल्पाच्या प्रगतीचा प्रत्यक्ष आढावा घेऊन प्रकल्प शास्त्रोक्त पध्दतीने राबविण्याच्या दृष्टीने आवश्यक सुचना द्याव्यात. त्याचप्रमाणे, गटांच्या/उत्पादक कंपनींच्या प्रकल्पांतर्गत कामे पुर्ण झाल्यानंतर मोका तपासणी करुन सनदी स्थापत्य अभियंत्यामार्फत प्रकल्पांतर्गत सर्व बाबींची शास्त्रोक्त पध्दतीने अंमलबजावणी झाल्याचे कार्यकारी अभियंता, लघु सिंचन (स्थानिक स्तर) यांनी प्रमाणित करावे.

९. प्रकल्पांतर्गत सच्छिद्र निचरा प्रणाली ही क्षेत्र उपचार पध्दती आहे त्यामुळे प्रकल्प मंजुरी देण्यात आलेल्या शेतकरी गटाच्या संपूर्ण प्रक्षेत्रावर सर्व सभासद शेतकऱ्यांनी प्रकल्पाची अंमलबजावणी करणे बंधनकारक राहील व गटाकरिता मंजूर प्रक्षेत्रावर सर्व शेतकऱ्यांनी सच्छिद्र निचरा प्रणाली बसवून प्रकल्प पूर्ण केल्यानंतरच गटातील शेतकरी अनुदानासाठी पात्र राहतील. या प्रकल्पांतर्गत लाभार्थी शेतकऱ्यांना संपूर्ण गटाचा प्रकल्प पूर्ण झाल्यानंतर वैयक्तिक शेतकऱ्यांच्या बँक कर्ज खात्यावर अनुदान अदा करण्यात येईल (Credit Linked Back ended Subsidy).

१०. संबंधित गटांच्या/उत्पादक कंपनींच्या सभासद शेतकऱ्यांना अर्थसहाय्य केलेल्या राष्ट्रीयकृत बँकेचे निधी उपयोगिता प्रमाणपत्र/प्रकल्प पूर्ण झाल्याचे प्रमाणपत्र तसेच, सनदी स्थापत्य अभियंत्यामार्फत प्रकल्प पूर्ण झाल्याबाबतचे प्रमाणपत्र घेऊन कार्यकारी अभियंता, लघु सिंचन (स्थानिक स्तर) यांनी प्रकल्प मंजुरी दिलेल्या शेतकरी गटाच्या संपूर्ण प्रक्षेत्रावर प्रकल्पाची अंमलबजावणी पूर्ण झाल्याचे मोका तपासणीअंती प्रमाणित करुन प्रकल्पाची अंमलबजावणी करणाऱ्या संबंधित गटांच्या/उत्पादक कंपनींच्या सर्व सभासद शेतकऱ्यांना अनुदान वितरणाची शिफारस शासनास करावी

११. अनु. क्र. १० नुसार कार्यकारी अभियंता, लघु सिंचन (स्थानिक स्तर) यांची शिफारस प्राप्त झाल्यानंतर शासन स्तरावरुन राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत समस्याग्रस्त जमीन सुधारणा कार्यक्रम (Reclamation of Problematic Soil) या उप-योजने अंतर्गत निधी वितरणाची कार्यवाही करण्यात येईल.

१२. शासनाने निधी वितरीत केल्यानंतर कार्यकारी अभियंता, लघु सिंचन (स्थानिक स्तर) यांनी प्रकल्पांतर्गत शेतकऱ्यांना प्रती हेक्टरी रु.६०,०००/- याप्रमाणे त्यांच्या आधार संलग्न बँक कर्ज खात्यावर अनुदान जमा करावे व सदर निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

--------